छत्रपती संभाजीनगर येथील महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्ड मुख्यालय या कार्यालयासाठी प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन पूरकपत्र क्रमांक-अविवि-२०२४/प्र.क्र.१३५/का-०१ (०२)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-**

१. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०.९.२०१९
२. सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन परिपत्रक क्र-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.९.२०१९
३. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.जिनिसछसंअल्प.आ.ईमारत/२०२४/२७३१, दि.०३.१०.२०२४
४. शासन निर्णय समक्रमांक दि.०४.१०.२०२४

**प्रस्तावना-:**

छत्रपती संभाजीनगर येथील महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्ड मुख्यालय या शासकीय कार्यालयाकरिता जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रशासकीय इमारत बांधकाम प्रस्तावास (₹१४.९९ कोटी) संदर्भाधीन क्र.४ येथील दि.०४.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये उक्त कार्यालयाच्या बांधकामासाठी येणारा खर्च अदा करण्यासाठी आवश्यक असणारे लेखाशिर्ष नमूद करण्यात आले नसल्याने सदर बांधकामासाठी आवश्यक निधीची तरतूद करणे अशक्य होत आहे. यास्तव सदर शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन पूरकपत्र:-**

महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्ड मुख्यालय, छत्रपती संभाजीनगर येथील या शासकीय कार्यालयाकरिता ₹१४.९९ कोटी इतक्या रक्कमेच्या प्रशासकीय इमारत बांधकाम प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. सदर बांधकामासाठी येणारा खर्च खर्च "मागणी क्र.झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, १९९ इतर अशासकीय संस्थांना सहाय्यक (०१) (०१) महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्डाला

सहायक अनुदान, ३१ सहायक अनुदान (२२३५ ए७४१)" या लेखाशिर्षाखालील वक्फ मंडळाच्या बळकटीकरणासाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

२. सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०२२७११२०५२३६१४ असा आहे. हा शासन पूरकपत्र डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2025.02.27 11:21:44 +05'30'

( प्र. दा. अंधारे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अ.मु.स, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अ.मु.स., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर.
५. जिल्हाधिकारी,छत्रपती संभाजीनगर.
६. आयुक्त, महानगरपालिका, छत्रपती संभाजी नगर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजी नगर.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्ड मुख्यालय, छत्रपती संभाजीनगर.
११.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजी नगर.
१२.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजी नगर.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजी नगर.
१४.वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१५.नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१६.निवड नस्ती, (का.७)